भा.प्र.से. अधिकऱ्यांचे कार्यमूल्यांकन अहवाल प्रतिवेदन/पुनर्विलोकन/स्वीकृती अधिकारी ठरविणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः सीपीएफ-१०२३/प्र.क्र.३९२ /२०२३/दहा,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
तारीख: **१३.०३.२०२४.**

वाचा-: १) शासन परिपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१०/प्र.क्र.४४४/२०१०/दहा, दिनांक २८.०३.२०११.
२) शुध्दीपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१०/प्र.क्र.४४४/२०१०/दहा, दिनांक ०९.०५.२०१३.
३) शासन निर्णय क्रमांक-एईओ-१०१५/प्र.क्र.४८६/२०१५/दहा, दिनांक २८.१२.२०१५.
४) शासन परिपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१८/प्र.क्र.१९/२०१८/दहा, दिनांक २१.०२.२०१८.
५) शासन परिपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१८/प्र.क्र.१९/२०१८/दहा, दिनांक ०८.०१.२०२०.
६) शासन परिपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०२२/प्र.क्र.२१/२०२२/दहा, दिनांक २१.०६.२०२२.

परिपत्रक -

केंद्र शासनाने सन २००७-२००८ पासून भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांसाठी गोपनीय अहवालाऐवजी कार्यमूल्यांकन अहवाल (P A R) विहित करणारे सुधारित नियम अधिसूचित केले असून, राज्यातील सर्व (प्रत्येक) भा.प्र.से. अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यांकन अहवाल कोणी प्रतिवेदन / पुनर्विलोकन / स्वीकृत करावे हे दर्शविणाऱ्या प्राधिकाऱ्यांची एकत्रित यादी दि.२८.०३.२०११, दि.०९.०५.२०१३, दि.२१.०२.२०१८, दि.०८.०१.२०२० व दि.२१.०६.२०२२ च्या परिपत्रकान्वये व शुध्दीपत्रकान्वये ठरविण्यात आली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथे नमूद शासन परिपत्रकातील सहपत्रातील अ.क्र.५३ मधील "प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास" या पदावर कार्यरत भाप्रसे अधिकाऱ्यांच्या कार्यमूल्यांकन अहवाल प्रतिवेदन/पुनर्विलोकन/स्वीकृती याबाबतची तरतूद अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे तरतूद विहीत करण्यात येत आहे:-

| Sr. No. | Designation | Reporting Authority | Reviewing Authority | Accepting Authority |
|---|---|---|---|---|
| 53 | Assistant Collector and Project Officer, Integrated Tribal Development Project | Collector | Divisional Commissioner | Addl. Chief Secretary / Principal Secretary / Secretary (Revenue, Registration & Stamp), Revenue and Forest Deptt., |
| | | Collector | Divisional Commissioner | Chief Secretary (Provided that Accepting authority is junior or of the same batch as that of the reviewing authority) |

३. यापुढे सन २०२३-२४ पासून ११ अतिसंवेदनशील आणि मागास प्रकल्पांतील "सहायक जिल्हाधिकारी तथा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प" या पदावर नियुक्त होणाऱ्या भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यांकन अहवाल पुनर्विलोकीत करतांना सहायक जिल्हाधिकारी पदाच्या कामकाजाच्यासोबतच, या अधिकाऱ्यांनी त्यांच्या प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास या पदाच्या केलेल्या कामकाजाची माहिती संबंधित विभागीय आयुक्त यांनी संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचेकडून प्राप्त करुन घ्यावी व त्याआधारे कार्यमूल्यांकन अहवाल पुनर्विलोकीत करावे.

४. या व्यतिरिक्त इतर सर्व तरतुदी दिनांक २८.०३.२०११ च्या शासन परिपत्रकामध्ये, दि.०९.०५.२०१३ च्या शुध्दीपत्रकामध्ये आणि दि.२१.०२.२०१८, दि.०८.०१.२०२० व दि.२१.०६.२०२२ च्या परिपत्रकामध्ये नमूद केल्याप्रमाणे लागू राहतील.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०३१३११०८११६००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUCHITA MOHAN MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E146A6DDC8FB6681D49A5099661D41639DA6C568419F071BB9CDFD8A2E08058C, cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2024.03.14 13:02:01 +05'30'

**(सु.मो.महाडिक)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री, मंत्रालय यांचे प्रधान सचिव / सचिव,
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,
५. अपर मुख्य सचिव (महसूल, नोंदणी व मुद्रांक शुल्क), महसूल व वन विभाग,
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
७. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
१०. सर्व जिल्हाधिकारी,
११. सर्व अप्पर आयुक्त, आदिवासी विकास,
१२. सर्व सहायक जिल्हाधिकारी व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१३. निवडनस्ती.